**महाराष्ट्र अभियांत्रिकी (स्थापत्य) सेवा परीक्षा-२०२० मधील सहायक अभियंता श्रेणी-१ (स्थापत्य), गट-अ पदावर नामनिर्देशनाने देण्यात आलेली तात्पुरती नियुक्ती रद्द करणेबाबत...**
**श्री. अनंत अजित उपाध्ये (इ.मा.व.)(गु.क्र.३)**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश, क्रमांकः जीएबी २०२२/प्र.क्र.१८४/सेवा-२**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: २८/०५/२०२४

**वाचा -**

१) महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांचे पत्र क्र.३७४(२)/ स्थापत्य/२०१९/१९, दि.१७.०८.२०२२, दि. २५.०८.२०२२

२) सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्रमांक एसआरव्ही २०१६/प्र.क्र.२८१/बारा,दि.२१.०६.२०२१

३) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन आदेश क्र.जीएबी-२०२२/प्र.क्र.१८५/सेवा-२, दि. १०.११.२०२३

४) सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र.जीएबी-२०२२/प्र.क्र.१८५(भाग-१)/सेवा-२, दि. १८.०१.२०२४ व दि. २३/०२/२०२४ रोजीची पत्रे

**शासन आदेश -**

महाराष्ट्र अभियांत्रिकी (स्थापत्य) सेवा परीक्षा २०२० मधील सहायक अभियंता श्रेणी-१ (स्थापत्य) या गट-अ पदांवरील नियुक्तीसाठी सरळसेवा भरतीद्वारे घेण्यात आलेल्या एकत्रित स्पर्धात्मक परिक्षेच्या निकालावर आधारित महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांनी संदर्भ क्रमांक १ येथील दिनांक १७.०८.२०२२ रोजीच्या पत्रान्वये सहायक अभियंता श्रेणी-१ (स्थापत्य) पदावर नियुक्तीसाठी शिफारस केलेल्या ४८ उमेदवारांपैकी आर्थिक दृष्ट्या दुर्बल घटक प्रवर्गातून शिफारस केलेले उमेदवार वगळता उर्वरित ४३ उमेदवारांना संदर्भ क्र. ३ येथील दि. १०.११.२०२३ रोजीच्या शासन आदेशान्वये सार्वजनिक बांधकाम विभागामध्ये सहायक अभियंता श्रेणी-१ (स्थापत्य), गट-अ या पदावर सातव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतन मॅट्रीक्समधील वेतन स्तर एस-२० (रुपये ५६,१००-१,७७,५००) मध्ये ते ज्या दिवशी रूजू होतील त्या दिनांकापासून त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या प्रवर्गामध्ये दोन वर्षांच्या परिवीक्षाधीन कालावधीसाठी विहित अटी व शर्तीच्या अधीन राहून तात्पुरती नियुक्ती देण्यात आली आहे.

२. उक्त शासन आदेशान्वये "नियुक्ती देण्यात आलेले उमेदवार प्रशिक्षणाकरिता हजर न झाल्यास किंवा काही अपरिहार्य कारणास्तव त्यांना मुदतवाढ हवी असल्यास, त्यांनी शासनाकडून

मुदतवाढ घेणे आवश्यक असून तशी संमती न घेतल्यास किंवा शासनाकडून त्यांना मुदतवाढ न मिळाल्यास विहित मुदतीत रुजू न होणाऱ्या उमेदवारांचे नियुक्तीचे आदेश आपोआप रद्द होतील व त्यांचा नियुक्तीकरीता कोणत्याही परिस्थितीत विचार करण्यात येणार नाही. यासाठी उमेदवारांकडून देण्यात येणाऱ्या कोणत्याही कारणांचा/विनंतीचा विचार केला जाणार नाही," अशा सूचना देण्यात आल्या होत्या.

३. संदर्भ क्र. ४ येथील दि. १८.०१.२०२४ रोजीच्या शासनपत्रान्वये श्री. अनंत अजित उपाध्ये, (इ.मा.व.) (गु. क्र.३) यांना नियुक्तीच्या पदावर पत्राच्या दिनांकापासून ७ दिवसांच्या आत महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक येथे रुजू होण्याबाबत तसेच, नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजू न झाल्यास नियुक्तीमध्ये स्वारस्य नाही, असे गृहीत धरून त्यांची सहायक अभियंता श्रेणी-१ (स्थापत्य), गट-अ (राजपत्रित) या पदावरील नियुक्ती रद्द करण्यात येईल, असे कळविण्यात आले होते. तसेच, शासन स्मरणपत्र दि. २३.०२.२०२४ अन्वये श्री. उपाध्ये यांना नियुक्तीच्या पदावर पत्राच्या दिनांकापासून ७ दिवसांच्या आत महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक येथे रुजू होण्याबाबत **अंतिम संधी देण्यात आली होती**. तसेच, नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजू न झाल्यास नियुक्तीमध्ये स्वारस्य नाही, असे गृहीत धरून त्यांची सहायक अभियंता श्रेणी-१ (स्थापत्य), गट-अ (राजपत्रित) या पदावरील नियुक्ती रद्द करण्यात येईल, असे कळविण्यात आले होते. **मात्र, श्री. अनंत अजित उपाध्ये हे नियुक्तीच्या पदावर अद्यापही रुजू झाले नाहीत.** तसेच, शासनाकडे कोणताही पत्रव्यवहार केला नाही. यावरून त्यांना नियुक्तीमध्ये स्वारस्य नसल्याचे दिसून येते. यास्तव, **श्री. अनंत अजित उपाध्ये यांची संदर्भ क्र.३ येथील दि.१०.११.२०२३ रोजीच्या आदेशान्वये सहायक अभियंता श्रेणी-१ (स्थापत्य) गट-१ पदावर करण्यात आलेली नियुक्ती या शासन आदेशाद्वारे रद्द करण्यात येत आहे.**

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०५२८१७४२५३७९१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

DATTATRAY VASANTRAO KHARKE

Digitally signed by DATTATRAY VASANTRAO KHARKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=d598800beb5ed37ae09d78fff05921827123426ec3977a7476478ce183be979d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6BAEF55AD6F77A3A40CCCC3E9DD0F50E344AB83A754542299875CF07868ED88B, cn=DATTATRAY VASANTRAO KHARKE
Date: 2024.05.28 17:56:32 +05'30'

**( द. व. खारके )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री. अनंत अजित उपाध्ये, २२७, आझाद रोड, गल्ली नं.८, जयसिंगपूर, ता. शिरोळ, जि. कोल्हापूर पिन कोड- ४१६ १०१ ( ई-मेल द्वारे)

प्रत-

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
२. महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
३. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर
४. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग
५. अधीक्षक अभियंता तथा सह संचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक
६. सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ
७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
८. निवासी लेखाधिकारी, मुंबई
९. अपर मुख्य सचिव (सा.बां.) यांचे स्वीय सहायक सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
११. सचिव (बांधकामे)यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. कार्यासन-सेवा-१/सेवा-३/सेवा-६/आस्था-१/आस्था-३/संगणक कक्ष, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. कार्यासन सेवा-२ (निवडनस्ती)